लघुटंकलेखक पदावरुन निम्नश्रेणी लघुलेखक पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग

**शासन आदेश क्रमांक : एएससी १५१९/प्र.क्र.१४०/१४-अ,**
**खोली क्र. ५५७/५५९ (विस्तार), पाचवा मजला ,मंत्रालय,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.**
**तारीख: १३ ऑगस्ट, २०२०**

**आदेश**

सन २०१९-२०२० या निवडसूची वर्षामध्ये मंत्रालयीन विभागातील खालील लघुटंकलेखक (गट (क) - वेतनश्रेणी एस-८ रु.२५,५०० -८१,१००/- ) यांना निम्नश्रेणी लघुलेखक (गट (ब) अराजपत्रित- वेतनश्रेणी एस -१४ रु.३८,६०० - १,२२,८००/-) पदावर या आदेशाद्वारे विहित अटींच्या अधिनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर लघुटंकलेखक यांची पदोन्नतीनंतर त्यांच्या नावासमोर स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये पदस्थापना करण्यात येत आहे

| अ.क्र. | लघुटंकलेखकाचे नांव | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | निम्नश्रेणी लघुलेखक पदावर पदोन्नती नंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती पू.पां.सरगर | भज(क) | उद्योग, ऊर्जा व कामगार | विधि व न्याय विभाग |
| २ | श्री.स.चं.साळुंखे | खुला | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ३ | श्रीमती सु.स.बाचल | इमाव | कृषि व पदुम विभाग | नगर विकास विभाग |
| ४ | श्री.चां.भि.राठोड | विजा(अ) | महसूल व वन विभाग | गृह विभाग |
| ५ | श्री.घ.कि.लोखंडे | अजा | नगर विकास विभाग | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |
| ६ | श्रीमती सो.द.पाटील | खुला | ग्राम विकास विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ७ | श्री.वि.भ.तेहरे | इमाव | सार्वजनिक बांधकाम विभाग | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग |
| ८ | श्रीमती शु.भै.मेश्राम | भज(ब) | नियोजन विभाग | कृषि व पदुम विभाग |
| ९ | श्री.र.म.चौधरी | अज | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| १० | श्री.उ.वि.काळगापुरे | इमाव | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| ११ | श्रीमती सु.अ.पाटील | खुला | ग्राम विकास विभाग | जलसंपदा विभाग |
| १२ | श्री.रा.म.सोळंके | अज | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | कृषि व पदुम विभाग |
| १३ | श्रीमती रु.वे.राऊत | इमाव | नियोजन विभाग | नियोजन विभाग |
| १४ | श्रीमती प्रि.बु.जाधव | इमाव | महसूल व वन विभाग | प्रपत्र बढती - मा.मुख्यमंत्री कार्यालय |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १५ | श्री.ध.वि.वाणी | इमाव | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| १६ | श्रीमती वि.के.दातार | अजा | सामान्य प्रशासन विभाग | मराठी भाषा विभाग |
| १७ | श्री.दि.दे.महाले (शा.अ.) | भज (क) | महसूल व वन विभाग | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |
| १८ | श्री.श.ग.कुलकर्णी | खुला | वित्त विभाग | वित्त विभाग |
| १९ | श्रीमती ब.भि.पाटील | खुला | सार्वजनिक बांधकाम विभाग | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| २० | श्रीमती प्रि.भि.शिंदे | खुला | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| २१ | श्रीमती रो.र.सोनुने | भज(ब) | गृहनिर्माण विभाग | गृहनिर्माण विभाग |
| २२ | श्रीमती अं.अ.औटी | खुला | सार्वजनिक आरोग्य विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| २३ | श्री.शि.वि.पत्रे | इमाव | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| २४ | श्रीमती म.व.राजकुंवर | इमाव | वित्त विभाग | जलसंपदा विभाग |
| २५ | श्री.रा.ना.गुंडे | इमाव | सार्वजनिक बांधकाम विभाग | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| २६ | श्रीमती सु.शि.कुलुलवाड | अज | वित्त विभाग | आदिवासी विकास विभाग |
| २७ | श्रीमती प्रि.पु.बोचकारी | इमाव | महसूल व वन विभाग | अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| २८ | श्री.स.ल.पवार | अजा | वित्त विभाग | वित्त विभाग |
| २९ | श्रीमती वै.मा.आगोशे | अज | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| ३० | श्री.प्र.ल.मुऱ्हे | अज | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय विधि व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी अशा सूचना सा.प्र.वि./का.१६-ब ने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून तसेच पुढील अटीच्या अधीन राहून संबंधित लघुटंकलेखक यांना निम्नश्रेणी लघुलेखक संवर्गात खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) **सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील तदर्थ पदोन्नती राहील**.

२) सदर पदोन्नत्या, सद्य:स्थितीत लघुटंकलेखक या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या/तदर्थ स्वरुपात देण्यात येत आहेत.

३) **सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधितांचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही**.

४) सन २०१९-२०२० या निवडसूची वर्षाकरिता पात्र लघुटंकलेखक यांची निवडसूची तदर्थ स्वरुपाची असून निम्नश्रेणी लघुलेखक पदावरील पदोन्नत्या ह्या तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. **परिणामी निवडसूचीतील लघुटंकलेखकांना निम्नश्रेणी लघुलेखक या नियमित पदाचे व सेवा ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क मिळणार नाहीत.**

५) संबंधित लघुटंकलेखक यांनी निम्नश्रेणी लघुलेखक पदावरील तदर्थ पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नांव सन २०१८-२०१९ या वर्षीच्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत निम्नश्रेणी लघुलेखक पदावरील तदर्थ पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

६) सदर लघुटंकलेखक यांची निम्नश्रेणी लघुलेखक पदावरील तदर्थ पदोन्नती ही त्यांच्याविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. संबंधित विभागाने याची खातरजमा करावी.

७) मागास प्रवर्गातील लघुटंकलेखक यांची पदोन्नती ही शासन निर्णय दिनांक २५.०५.२००४ मधील तरतूदीनुसार त्यांना आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत तसेच सदर लघुटंकलेखकांचे जात वैधता प्रमाणपत्र संबंधित जातपडताळणी समितीने निर्गमित केले आहे या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे. संबंधित विभागाने याची खातरजमा करावी.

८) हे आदेश तत्काळ अंमलात येतील. निम्नश्रेणी लघुलेखक पदावर पदोन्नत झालेल्या लघुटंकलेखक यांना संबंधित विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नत निम्नश्रेणी लघुलेखक यांनी पदस्थापना केलेल्या विभागात तत्काळ रूजू व्हावे. संबंधित विभागांनी कार्यमुक्तता तसेच रुजू करुन घेतल्याच्या आदेशाच्या प्रती या विभागास पाठवाव्यात.

३. दरम्यान, पदोन्नतीमधील आरक्षणाबाबत राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ व इतर राज्यांच्या याचिकेबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १५.०४.२०१९ रोजी पुढील प्रमाणे आदेश पारित केले आहेत."*Until further orders status quo, as it exists today, shall be maintained.*" याबाबत कार्यासन १६-ब यांनी खालील प्रमाणे अभिप्राय दिले आहेत. *"दिनांक १५.०४.२०१९ रोजी व आताही या कार्यासनाच्या दिनांक २९.१२.२०१७ च्या पत्रातील सूचना अस्तित्वात आहेत. सबब, पुढील आदेश होईपर्यंत सर्व पदोन्नत्यांबाबत या कार्यासनाच्या दिनांक २९.१२.२०१७ च्या पत्रातील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी."* सबब, सदर आदेशातील पदोन्नत्या शासन पत्र दिनांक २९.१२.२०१७ मधील

सूचनांनुसार केवळ तात्पुरत्या स्वरुपात व कार्यासन १६-ब यांनी दिलेल्या उपरोक्त अभिप्रायानुसार देण्यात येत आहेत.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी,स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम-४०, परिशिष्ट-२,अट क्र.१८ नुसार, प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेल्या उपरोक्त नमूद तक्त्यातील अ.क्र.१४ येथील श्रीमती प्रि.बु.जाधव यांना आदेशाच्या दिनांकापासून निम्नश्रेणी लघुलेखक पदावर प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा किंवा मूळ विभागात परत रूजू होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत राहील. त्यानंतर त्यांनी त्यांच्या मूळ विभागातील निम्नश्रेणी लघुलेखकांच्या रिक्त पदावर हजर होणे आवश्यक आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१३१५०८३०४९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.08.13 16:16:27 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
संबंधित लघुटंकलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**
१. अ.मु.स./प्र.स./सचिव, संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
२. सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
३. निवडनस्ती.